**<u>भाषा सल्लागार समितीची पुनर्रचना करणेबाबत.</u>**

# महाराष्ट्र शासन
## मराठी भाषा विभाग
## शासन निर्णय क्रमांकः भासस-२०१५/प्र.क्र.३०/भाषा-१

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०५ ऑगस्ट, २०१५

**<u>वाचा :-</u>**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.भासस-२०१०/प्र.क्र.७४/२०-ब, दि. २२ जून, २०१०.
२) शासन निर्णय, मराठी भाषा विभाग, क्र.भासस-२०११/प्र.क्र.१/भाषा-२,दि. १५ जून, २०११.
३) शासन निर्णय,मराठी भाषा विभाग, क्र.भासस-२०११/प्र.क्र.२९(भाग-२)/भाषा-२,दि.९एप्रिल, २०१२.
४) शासन निर्णय, मराठी भाषा विभाग, क्र.भासस-२०१२/प्र.क्र.३/भाषा-४,दि.१२ मार्च, २०१३.
५) शासन निर्णय, मराठी भाषा विभाग, क्र.भासस-२०१३/प्र.क्र.३८/भाषा-४, दि.११ ऑक्टोबर, २०१३.
६) शासन निर्णय, मराठी भाषा विभाग, क्र.भासस-२०१३/प्र.क्र.३८/भाषा-४, दि.२८ ऑक्टोबर, २०१३.
७) शासन निर्णय, मराठी भाषा विभाग, क्र.भासस-२०१४/प्र.क्र.५४/भाषा-४,दि. १९ मार्च, २०१५.
८) शासन निर्णय, मराठी भाषा विभाग, क्र.भासस-२०१५/प्र.क्र.२/भाषा-१,दि. २० जुलै, २०१५.

**<u>प्रस्तावना :-</u>**

महाराष्ट्र राज्याचे साधारणपणे पुढील २५ वर्षातील मराठी भाषेचे धोरण ठरविणे, भाषा अभिवृध्दीसाठी नवनवे उपाय व कार्यक्रम सुचविणे व या अनुषंगाने शासनाला मार्गदर्शन करणे तसेच भाषा संचालनालयाने प्रकाशित केलेल्या अनेक कोशांमध्ये नविन प्रचलित शब्दांची भर घालून कोश अद्ययावत करणे, नवीन परिभाषा कोशांची उदा. आयुर्वेद, सागर विज्ञान, संगणक शास्त्र, पर्यावरणशास्त्र इ. निर्मिती करणे, परिभाषा कोशांचे पुनर्मुद्रण, परिभाषेतील अत्यावश्यक परिष्करणे, शब्दव्युत्पती, मराठी परिभाषिक संज्ञांच्या समस्या सोडविणे यासारखी कामे पार पाडण्यासाठी कायमस्वरुपी भाषा सल्लागार समितीची स्थापना संदर्भाधीन दि.२२ जून,२०१० च्या शासन निर्णयान्वये करण्यात आली आहे. या समितीच्या अध्यक्षांनी राजीनामा दिल्यामुळे अध्यक्ष या पदावर डॉ.नागनाथ कोत्तापल्ले यांची संदर्भाधीन दि.९ एप्रिल,२०१२ च्या शासन निर्णयान्वये नियुक्ती करण्यात आली. त्यांनतर या समितीअंतर्गत संदर्भाधीन शासन निर्णय दि.१२ मार्च,२०१३ अन्वये स्थायी समिती गठित करण्यात आली असून दि.११ ऑक्टोबर,२०१३ रोजीच्या शासन निर्णयान्वये भाषा सल्लागार समितीची पुनर्रचना करण्यात आलेली आहे. तसेच, संदर्भाधीन दि.२८ ऑक्टोबर, २०१३ च्या शासन निर्णयान्वये राजभाषा मराठीचे पुढील २५ वर्षासाठीचे धोरण ठरविण्यासाठी मसुदा तयार करण्याकरीता उपसमिती तसेच दि.१९ मार्च,२०१५ च्या शासन निर्णयान्वये शासनव्यवहारकोश सुधारणा उपसमिती स्थापन करण्यात आलेली आहे. भाषा सल्लागार समितीचे अध्यक्ष डॉ.नागनाथ कोत्तापल्ले यांचा कार्यकाळ दि.३१ जुलै, २०१५ रोजी संपुष्टात येत असल्यामुळे भाषा सल्लागार समितीअंतर्गत गठित केलेल्या उपरोक्त सर्व उप समित्या रद्द करुन भाषा सल्लागार समितीची पुनर्रचना करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार समितीची पुनर्रचना करण्याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**<u>शासन निर्णय :-</u>**

राज्याचे राजभाषा मराठीचे धोरण ठरविण्यासाठी कायमस्वरुपी भाषा सल्लागार समिती स्थापन करण्यात आली असून समितीची या पुनर्रचना करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. त्यानुसार पुनर्रचित भाषा सल्लागार समितीचे अध्यक्ष व सदस्य खालीलप्रमाणे असतील.

| अ.क्र. | नांव | पद |
|---|---|---|
| १ | श्री.सदानंद मोरे | अध्यक्ष |
| २ | श्री.अनिल गोरे | सदस्य |
| ३ | डॉ.हेमचंद्र प्रधान | सदस्य |
| ४ | डॉ.अविनाश बिनिवाले | सदस्य |
| ५ | प्रा.पुष्पा गावीत | सदस्य |
| ६ | प्रा. शंकर धडके | सदस्य |
| ७ | प्रा.प्रकाश परब | सदस्य |
| ८ | श्री.अरुण करमरकर | सदस्य |
| ९ | श्री.अरुण जोशी | सदस्य |
| १० | श्री.श्री.द.महाजन | सदस्य |
| ११ | डॉ.गिरीश दळवी | सदस्य |
| १२ | श्री.माधव जोशी | सदस्य |
| १३ | श्रीमती अश्विनी मयेकर | सदस्य |
| १४ | श्रीमती स्वाती राजे | सदस्य |
| १५ | ॲड दीपक गायकवाड | सदस्य |
| १६ | प्रा.संतोष क्षीरसागर | सदस्य |
| १७ | श्री.विनोद पवार | सदस्य |
| १८ | डॉ.दिलीप धोंडगे | सदस्य |
| १९ | डॉ.सुजाता महाजन | सदस्य |
| २० | डॉ.विनोद रामराव राठोड | सदस्य |
| २१ | अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव(मराठी भाषा विभाग) | सदस्य |
| २२ | अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव(पर्यटन व सां.का. विभाग) | सदस्य |
| २३ | अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव(शालेय शिक्षण विभाग) | सदस्य |
| २४ | अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव(उच्च व तंत्र शिक्षण विभाग) | सदस्य |
| २५ | संचालक, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई, | सदस्य |
| २६ | सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई, | सदस्य |
| २७ | सचिव, महाराष्ट्र राज्य विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई | सदस्य |
| २८ | संचालक, भाषा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई, | सदस्य सचिव |

२. उपरोक्त समितीवरील अशासकीय सदस्यांची नियुक्ती सदर शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून ३ वर्षाकरीता राहील. अध्यक्ष व अशासकीय सदस्यांचा कार्यकाल संपल्यानंतर नवीन अध्यक्षांची व सदस्यांची नियुक्ती करण्याचे अधिकार शासनाला राहतील.

३. भाषा सल्लागार समितीवरील अध्यक्ष व अशासकीय सदस्यांना शासन निर्णय वित्त विभाग क्र. प्रवास १०१०/प्र.क्र.२/सेवा-५ दि.३ मार्च, २०१० नुसार रु. ८,९००/- व त्याहून अधिक ग्रेड वेतन असणा-या शासकीय कर्मचा-यांच्या दराने प्रवास भत्ता व दैनिक भत्त्ता अनुज्ञेय असेल. मात्र त्यांना विमान प्रवास व रेल्वेच्या वातानुकुलित प्रथम वर्गाचा प्रवास अनुज्ञेय असणार नाही. समितीच्या अध्यक्षांना वित्त विभाग शासन निर्णय क्र.शासाउ १०.१०/प्र.क्र.९६/१०/सा.उ, दि.१३ मार्च, २०१२ नुसार मानधन व बैठक भत्ता अनुज्ञेय राहील. अशासकीय सदस्यांना शा.नि.क्र.भाससं२०११/प्र.क्र.१/भाषा २, दिनांक १५ जून, २०११ व वित्त विभाग शासन निर्णय क्र. बैठक २०१२/प्र.क्र.१/सेवा - ५, दि.२४ मे, २०१२ नुसार बैठक भत्ता अनुज्ञेय राहील.

४. भाषा सल्लागार समितीची कार्यकक्षा सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. भाससं २०१०/ प्र.क्र. ७४/२०-ब , दि.२२ जून, २०१० प्रमाणे राहील.

५. भाषा सल्लागार समितीच्या बैठका महिन्यातून किमान एकदा व्हाव्यात असे अपेक्षित असून, बैठकांच्या निमित्ताने होणारा खर्च भाषा संचालनालयाच्या मंजूर अर्थसंकल्पीय अनुदानातून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८०५१५१००३५७३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Aparna Arvind Gawde

Digitally signed by Aparna Arvind Gawde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Aparna Arvind Gawde
Date: 2015.08.05 15:13:34 +05'30'

**( अपर्णा अ.गावडे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. प्रधान सचिव (मराठी भाषा विभाग), मंत्रालय, मुंबई,
३. अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव( पर्यटन व सां.का. विभाग), मंत्रालय, मुंबई ,
४. अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव(शालेय शिक्षण विभाग), मंत्रालय, मुंबई,

५. अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव(उच्च व तंत्र शिक्षण विभाग), मंत्रालय, मुंबई,
६. मा.मंत्री, मराठी भाषा यांचे विशेष कार्यकारी अधिकारी,
७. सर्व मा.मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
८. प्रबंधक, मूळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने),
९. प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने),
१०. लोकायुक्त व उप लोकायुक्त यांचे कार्यालय, नवीन प्रशासन भवन, मंत्रालय, मुंबई,
११. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने),
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई/महाराष्ट्र-२,नागपूर,
१३. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर,
१४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१६. सर्व मंत्रालयीन विभाग,
१७. वित्त विभाग (व्यय-४,सेवा-५,सेवा-६ व विनियम),
१८. मराठी भाषा विभागातील सर्व कार्यासने,
१९. संचालक, भाषा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२०. सहायक भाषा संचालक, भाषा संचालनालय, नवी मुंबई/पुणे/औरंगाबाद/नागपूर,
२१. संचालक, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई,
२२. सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई,
२३. सचिव, महाराष्ट्र राज्य विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई,
२४. सर्व संबंधित सदस्य (भाषा संचालनालय , मुंबई यांचेमार्फत),
२५. निवड नस्ती/भाषा-१.